राज्य व जिल्हा स्तरावर तंबाखु नियंत्रण कायदा २००३ च्या कलम ५ चे अंमलबजावणीचा आढावा घेण्यासाठी स्थापन केलेल्या समितीत बदल करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः तंनिका-२०१४/प्र.क्र.२५८/आ-५,

८ व १० मजला, संकुल इमारत, नविन मंत्रालय,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २५ फेब्रुवारी, २०१५.

वाचा :

१) सिगारेट व अन्य तंबाखुजन्य उत्पादने (जाहिरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण यांचे विनियम) कायदा, २००३.
२) सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी जारी केलेले राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमासंदर्भातील कार्यकारी मार्गदर्शक तत्व (ऑपरेशनल गाईडलाईन्स) २०१२.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : व्यसमु २००८/प्र.क्र.२४५/आ-५, दि. १ ऑक्टोबर, २००८.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः तंबाखू/बैठक २०१२/प्र.क्र.२६१/आ-५, दि. ५ फेब्रुवारी, २०१३.
५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः तंबाखू/बैठक २०१२/प्र.क्र.२६१/आ-५, दि. २२ नोव्हेंबर, २०१२.

प्रस्तावना :

सिगारेट व अन्य तंबाखुजन्य उत्पादने (जाहीरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण यांचे विनियम) कायदा २००३ च्या कलम ५ नुसार सिगारेट किंवा तंबाखुजन्य उत्पादने यांची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष जाहीरात करण्यास बंदी आहे. त्यानुसार वरील संदर्भ क्र. ३ येथे नमुद दि. १ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये सिगारेट व अन्य तंबाखुजन्य उत्पादने (जाहीरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण यांचे विनियम) कायदा २००३ च्या कलम ५ च्या प्रभावी अंमजबजावणीचा आढावा घेण्यासाठी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्यास शासन मंजुरी देण्यात आली आहे.

सन २००८ मध्ये राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम हा अन्न व औषध प्रशासनाच्या अखत्यारित असल्याने दि. १ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयात तंबाखू नियंत्रण कायदा, २००३ चे कलम ५ च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीचे सदस्य सचिव पद सहआयुक्त (अन्न), अन्न व औषध प्रशासन यांना देण्यात आले आहे. तसेच जिल्हास्तरीय समितीचे सदस्य सचिव पद हे जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांना देण्यात आले आहे. मात्र वरील संदर्भ क्र. २ येथील केंद्र शासनाने सन २०१२ मध्ये राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमध्ये, राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाचा नोडल ऑफिसर हा आरोग्य सेवेतील NPCDCS, NTCP, NMHP हे कार्यक्रम पाहाणारा अधिकारी असेल, अशा सूचना दिल्या आहेत. सद्यस्थितीत राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत राबविला जात असल्याने राज्यस्तरावर सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई व जिल्हास्तरावर जिल्हा शल्यचिकित्सक हे कार्यक्रमाचे नोडल ऑफिसर आहेत. त्यामुळे राज्यात राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम व तंबाखू नियंत्रण कायदा, २००३ चे कलम ५ ची प्रभावी अंमलबजावणी करणे सोयीचे व्हावे याकरिता दि. १ ऑक्टोबर, २००८ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीचे सदस्य सचिव पदी सहआयुक्त (अन्न), अन्न व औषध प्रशासन यांच्या ऐवजी तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाचे नोडल ऑफिसर या नात्याने सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई व जिल्हास्तरीय समित्यांचे सदस्य सचिव पदी जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त, अन्न व औषध प्रशासन यांच्या ऐवजी जिल्हा नोडल अधिकारी या नात्याने जिल्हा शल्यचिकित्सक अधिकारी यांची नियुक्ती करणे, तसेच सद्यस्थितीत सार्वजनिक आरोग्य विभागात एकच सचिवांचे पद कार्यरत असल्याने राज्यस्तरीय समितीच्या अध्यक्षपदी आयुक्त तथा सचिव (कुटुंब कल्याण), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय मुंबई याऐवजी सचिव, सार्वजनिक आरोग्य, मंत्रालय, मुंबई असा पदनामात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार वरील संदर्भ क्र. ३ येथे नमुद दि. १ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये सिगारेट व अन्य तंबाखुजन्य उत्पादने (जाहीरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण यांचे विनियम) कायदा २००३ च्या कलम ५ च्या अंमलबजावणीचा आढावा घेण्यासाठी राज्यात स्थापन केलेल्या राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय समितीत खालीलप्रमाणे बदल करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

अ) <u>**राज्यस्तरीय समिती**</u>

| | |
|---|---|
| १) प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई | सदस्य |
| ३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४) | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई | सदस्य |
| ५) | पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| * ६) | आरोग्य व तंबाखू नियंत्रण या क्षेत्रात काम करणारी स्वयंसेवी सामाजिक संस्था. | सदस्य |
| * ७) | एक विचारवंत | सदस्य |
| * ८) | एक मानसशास्त्रज्ञ | सदस्य |
| * ९) | समाज शास्त्रज्ञ | सदस्य |
| १०) | सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई | सदस्य सचिव/ नोडल ऑफिसर |

* क्र. ६ ते ९ वरील सदस्यांची नेमणूक अध्यक्ष करतील.

<u>राज्यस्तरीय समितीची कार्यकक्षा :-</u>

१. जिल्हा स्तरावर समित्या स्थापन झाल्याची खात्री करणे व आढावा घेणे.
२. दर तीन महिन्याला राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय समित्यांच्या सभा होतात की नाही याबाबत आढावा घेणे.
३. कायद्यानुसार प्रमाणित केलेले अधिकारी त्यांची कायदेशीर जबाबदारी योग्यरित्या पार पाडतात की नाही याचा आढावा घेणे .
४. कायद्याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांकडून हाताळल्या जाणाऱ्या प्रकरणांबद्दल आढावा व त्याबद्दलचे निर्णय याबाबत आढावा घेणे.
५. जिल्हा स्तरावर समित्यांना सुचना व मार्गदर्शन करणे.
६. जिल्हा स्तरावर समित्यांनी संदर्भित केलेल्या विषयावर निर्णय घेणे.
७. जिल्हा स्तरावर समित्यांकडून माहिती गोळा करुन केंद्र शासनास पाठविणे.
८. या कायद्याच्या कलम ५ चे उल्लंघन केल्याप्रकरणी कार्यवाही प्रस्तावित करणे.
९. या कायद्याचे उल्लंघन केल्याप्रकरणी कार्यपध्दती आखून देणे व टोबॅको हेल्प लाईन बद्दल कार्यवाही करणे.

ब) **<u>जिल्हास्तरीय समिती</u>**

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी/पोलिस आयुक्त | अध्यक्ष |
| २) | जिल्हा पोलिस अधिक्षक | सदस्य |
| ३) | आरोग्य वैद्यकीय अधिकारी (महानगरपालिका) | सदस्य |
| ४) | सहायक आयुक्त (अन्न), अन्न व औषध प्रशासन | सदस्य |

| | |
|---|---|
| ५) जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| * ६) आरोग्य व तंबाखू नियंत्रण या क्षेत्रात काम करणारी स्वयंसेवी सामाजिक संस्था | सदस्य |
| * ७) एक विचारवंत | सदस्य |
| * ८) एक मानसशास्त्रज्ञ | सदस्य |
| * ९) समाज शास्त्रज्ञ | सदस्य |
| *१०) जिल्ह्यातील नामवंत कॉलेजचे प्राचार्य | सदस्य |
| ११) जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य सचिव/ नोडल ऑफिसर |

* क्र. ६ ते १० वरील सदस्यांची नेमणूक अध्यक्ष मा. पालकमंत्री यांच्या सल्ल्याने करतील.

**जिल्हास्तरीय समितीची कार्यकक्षा**

१) तंबाखू प्रतिबंधक कायद्याच्या उल्लंघनाविषयी किंवा जाहीरातीसंबंधी तक्रारी करण्यासाठी व्यासपीठ उपलब्ध करुन देणे.
२) या कायद्याच्या कलम ५ च्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.
३) या कायद्याचे उल्लंघन होत असल्यास ही बाब राज्य शासनाच्या निदर्शनास आणून देणे.

२. महानगरपालिका क्षेत्र वगळून इतर भागासाठी जिल्हाधिकारी अध्यक्ष राहतील. महानगरपालिका क्षेत्रात पोलिस आयुक्त या समितीचे अध्यक्ष राहतील व विविध सदस्यांची नेमणूक त्यांच्या मार्गदर्शनाखाली होईल.

३. नामांकन झालेल्या सदस्यांची नेमणूक दोन वर्षाच्या कालावधीसाठी राहील. अशा सदस्यांची पुनर्नेमणूक करण्यात येणार नाही. सदस्यांची जागा रिकामी झाल्यास अध्यक्षांच्या संमतीने पुनर्नेमणूक करण्यात येईल.

४. विहीत कायद्याच्या मार्गदर्शक सुचनानुसार राज्य व जिल्हा स्तरावरील समित्या त्यांच्याकडे प्राप्त झालेल्या तक्रारीवर निर्णय घेतील.

५. या कायद्याच्या आंतरराज्य उल्लंघनाबद्दल राज्यस्तरीय समिती विहीत कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करेल. अशी प्रकरणे नोडल ऑफिसर उदा. सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई, मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग, महाराष्ट्र राज्य यांच्याकडेसुध्दा पाठविली जातील व त्यांच्याकडून योग्य ती कार्यवाही होईल. अशा प्रकरणाबद्दल केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाच्या सुकाणू समितीकडे माहिती कळविणे आवश्यक राहील.

६. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

७ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१३०५१८९७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2015.02.26 10:34:15 +05'30'

**( ज्ञा. ल. सुळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य), मा. मंत्री (वै.शि. व औ.द्र.), मा.राज्यंत्री (सार्वजनिक आरोग्य), मा. राज्यमंत्री (वै.शि. व औ.द्र.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मंत्रालयीन विभाग.
५. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लॅक्स, मुंबई.
६. सर्व जिल्हाधिकारी.
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१०. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
११. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१२. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
१३. सहआयुक्त, अन्न व औषध प्रशासन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लॅक्स, मुंबई.
१४. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
१५. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक.
१६. सर्व जिल्हा माहिती अधिकारी.
१७. आरोग्य वैद्यकीय अधिकारी (सर्व महानगरपालिका)
१८. सर्व जिल्हापरिषदा/महानगरपालिका /नगरपालिका/नगरपरिषदा.
१८. निवडनस्ती (आरोग्य-५).